राज्य क्रीडा विकास निधी मधून निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निविप्र-२०२४/प्र.क्र.२४/क्रीयुसे -३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.राक्रीधो २००२/ प्र.क्र.९३/ क्रीयुसे-१, दि. ३ सप्टेंबर, २००३.
२) क्रीडा व युवक सेवा पुणे यांचे पत्र क्रमांक.राक्रीविनी/निधी वितरण प्रस्ताव/ २३-२४/५२९८, दि. ७ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना: -**

शासन निर्णय समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र.राक्रीधो २००२/प्र.क्र.९३/क्रीयुसे-१ दि.३ सप्टेंबर,२००३ अन्वये महाराष्ट्र राज्यात क्रीडा संस्कृतीची जोपासना व संवर्धन परिणामकारक करण्याच्या दृष्टीने राज्यात क्रीडा सुविधा विकसीत करणे, राज्यातील दर्जेदार खेळाडूंना परदेशी क्रीडा मार्गदर्शकांची सेवा उपलब्ध करुन देणे व राज्यातील आंतरराष्ट्रीय खेळाडूंना आर्थिक सहाय्य करणे, प्रशिक्षणासाठी आर्थिक सहाय्य करणे तसेच क्रीडा विषयक उपक्रम परिणामकारक राबविणे या करिता राज्य क्रीडा विकास निधी ही योजना संचालनालय स्तरावर कार्यान्वित आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.५०.०० लक्ष इतक्या मंजूर तरतुदीपैकी रु.३५.०० लक्ष (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष फक्त) इतक्या निधीच्या वितरणास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्यात क्रीडा संस्कृतीची जोपासना व संवर्धन परिणामकारक करण्याच्या दृष्टीने राज्यातील आंतरराष्ट्रीय खेळाडूंना आर्थिक सहाय्य करणेसाठी रु. ५०.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे. त्यापैकी रु.३५.०० लक्ष (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष फक्त) तरतूद वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०४, (३५)(०१) राज्य क्रीडा निधीला अंशदान (२२०४ २०८२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकातील सुचनानुसार सदर निधी खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ संदर्भ क्र.२३२/व्यय-५ दि.०५.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४१२५११५५९५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.14 13:02:00 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) अपर मुख्य सचिव (क्रीडा),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) अवर सचिव, (व्यय-५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अवर सचिव, (अर्थसंकल्प ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) निवड नस्ती, क्रीयुसे-३